**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानांतर्गत नाशिक महानगरपालिकेस पाणी पूरवठा (Phase-II) या प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या हिश्श्याच्या पहिल्या हप्त्याचे अनुदान वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनयुआर-२०१४/प्र.क्र.७४(२)/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: २६ नोव्हेंबर, २०१४

**वाचा —**

**१) केंद्रीय वित्त मंत्रालयाचे आदेश क्रमांक एफ-५९(२)/पीएफ-१/२०१३-१६०३, दि. २८/०२/२०१४**

**२) नगर विकास विभाग शासन निर्णय क्र.एनयुआर-२०१४/प्र.क्र.७४(१)/नवि-३३ दिनांक २६ नोव्हेंबर, २०१४**

**प्रस्तावना —**

नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेऊन केंद्र शासनाने देशातील ठराविक शहरांमध्ये पायाभूत सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी "जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान" हा महत्वाकांक्षी कार्यक्रम दिनांक ३ डिसेंबर, २००५ रोजी जाहीर केला आहे.

०२. उक्त कार्यक्रमांतर्गत नाशिक महानगरपालिकेच्या पाणी पूरवठा (Phase-II) प्रकल्पास केंद्र शासनाच्या केंद्रीय मंजुरी समिती (Central Sanctioning and Monitoring Committee) ने मंजुरी दिली होती. संदर्भाधीन क्र. १ च्या आदेशान्वये नाशिक महानगरपालिकेस पाणी पूरवठा (Phase II) या प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या सदर मंजुरीनुसार तसेच उक्त योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार संदर्भाधीन क्र. २ अन्वये केंद्र शासनाच्या वितरित निधीच्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्श्याचा वितरित करावयाच्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | महानगर-पालिकेचे नाव | योजनेचे स्वरूप | मंजूर किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा (५० टक्के) | राज्य शासनाचा हिस्सा (२० टक्के) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (३० टक्के) | सध्या वितरीतकरावयाचा केंद्र शासनाचा हिस्सा | केंद्र शासनाच्या प्रमाणात सध्या वितरीत करावयाचे राज्य शासनाचे अनुदान | केंद्र शासनाच्या प्रमाणात सध्या वितरीत करावयाच्या राज्य शासनाच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | नाशिक | पाणी पूरवठा Phase II | २२०.३७८७ | ११०.१८९३ | ४४.०७५७ | ६६.११३७ | २७.५४७३ | **११.०१७९** | पहिला |

०३. वरील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे नाशिक महानगरपालिकेस पाणी पूरवठा (Phase-II) या प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय—**

जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानातंर्गत नाशिक महानगरपालिकेस पाणी पूरवठा (Phase-II) या प्रकल्पासाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या हिश्याचा पहिल्या हप्त्याचा निधी स्वतंत्रपणे वितरीत करण्यात आला आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | महानगर-पालिकेचे नाव | योजनेचे स्वरूप | मंजूर किंमत | केंद्र शासनामार्फत वितरीत निधी | केंद्र शासनाच्या वितरीत निधीच्या प्रमाणात वितरीत करावयाचा राज्य शासनाच्या हप्त्याचा निधी | राज्य शासनामार्फत वितरीत करावयाच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | नाशिक | पाणी पूरवठा (Phase-II) | २२०.३७८७ | २७.५४७३ | **११.०१७९** | पहिला |

०२. सदर रकमेचे वितरण अनुदान म्हणून करण्यात येत आहे. त्यानुसार उपरोक्त तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे रुपये अकरा कोटी, एक लक्ष, एकोणऐंशी हजार फक्त (रुपये ११,०१,७९,०००/-) इतका निधी वितरित करण्यासाठी मंजुरी देण्यात आली असून यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी सदर अनुदान रुपये अकरा कोटी, एक लक्ष, एकोणऐंशी हजार फक्त (रुपये ११,०१,७९,०००/-) इतक्या रक्कमेचा धनादेश आयुक्त, नाशिक महानगरपालिका (Commissioner, Nashik Municipal Corporation) या नावे काढून तो आयुक्त, नाशिक महानगरपालिका यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

०३. जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाच्या UIG या उपभियानांतर्गत प्रकल्पाचे SLNA तथा विशेष कार्य अधिकारी (JNNURM), मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी या संदर्भात आवश्यक तो पाठपुरावा करून सदरहू निधी विहित मुदतीत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस वितरीत केला जाईल याबाबत दक्षता घ्यावी.

०४. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र दिल्यानंतरच सदर योजनेअंतर्गत केंद्र शासन व राज्य शासनाचा पुढील हप्ता वितरित करण्यात येईल. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र नाशिक महानगरपालिकेकडून प्राप्त करून घेऊन महालेखापाल

कार्यालयास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी या नात्याने संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांची राहिल.

०५. केंद्र शासनाकडून प्रत्यक्ष पाहणीद्वारे या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेण्यात येईल. सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दर ३ महिन्यांनी राज्यस्तरीय नोडल एजन्सीमार्फत राज्य तसेच केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच केंद्र शासनास सादर करावा. अशाप्रकारे तिमाही अहवाल सादर करण्यास विलंब झाल्यास त्यांना पुढील हिस्सा प्रलंबित विनियोग अहवाल प्राप्त होईपर्यंत वितरीत करण्यात येणार नाही.

०६. प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०७. नाशिक महानगरपालिकेस देण्यात येणा-या अनुदान रुपये अकरा कोटी, एक लक्ष, एकोणऐंशी हजार फक्त (रुपये ११,०१,७९,०००/-) इतक्या रक्कमेचा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (५४) जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानांतर्गत महानगरपालिकांसाठी नगर-विकासाकरिता सहाय्य (राज्य हिस्सा) (२२१७ ३२२४), ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), या लेखशिर्षामधून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०८. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२३/व्यय-३, दि. ११/०९/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२७१३१७१९०१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Seema Pradeep Dhamdhere
Date: 2014.11.27 13:25:04 +05'30'

**( सीमा ढमढेरे )**

**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
३. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू.), मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
७. विशेष कार्य अधिकारी तथा नोडल एजन्सी फॉर जे.एन.एन.यु.आर.एम. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुबई ५१.
८. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१०. आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
११. जिल्हाधिकारी, नाशिक.
१२. निवडनस्ती, नवि-३३